**शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०२१७/ प्र.क्र.१६१/ पोल-७, दिनांक ०१.०७.२०१७, हे रद्द करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
**शासन निर्णय क्र. पोप्रमा-०२१७/ प्र.क्र.१६१/ पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०८ फेब्रुवारी २०१९.

वाचा :-
1) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०२१७/ प्र.क्र.१६१/ पोल-७, दिनांक ०१.०७.२०१७.
2) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. दुरूस्ती-१०१८/ प्र.क्र.३६५/ पोल-७, दिनांक २८.१२.२०१८.
3) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(१३)/ शा.३०१/ १८, दिनांक १२.१२.२०१८.

**प्रस्तावना.**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील माहुल, चेंबूर, येथील नवीन पोलीस वसाहतीमधील, खालील तक्त्यातील स्तंभ (२) मधील इमारतींची अंतर्गत दुरूस्ती करणे व बाह्य भागांची साफसफाई करणे या कामांसाठी, स्तंभ (३) मधील शासन ज्ञापनांद्वारे स्तंभ (४) मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे एकूण रु.१५,८२,८०,१२१/- इतक्या खर्चाच्या अंदाजांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्या होत्या:-

| अ.क्र. (१) | इमारतीचा क्रमांक (२) | शासन ज्ञापन क्रमांक व दिनांक (३) | मंजूर खर्चाचे अंदाज (४) |
|---|---|---|---|
| १. | इमारत क्र.२१ व २२ | पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ एक/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७ | रु.३,६४,१८,६२४/- |
| २. | इमारत क्र.२३ व २५. | पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ दोन/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७ | रु.३,६४,१८,६२४/- |
| ३. | इमारत क्र.२४, २६ व ६७. | पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ तीन/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७ | रु.४,६९,४७,४४७/- |
| ४. | इमारत क्र.२७, ६८ व ६९. | पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ चार/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७ | रु.३,८४,९५,४२६/- |
| **एकूण-** | | | **रु.१५,८२,८०,१२१/-** |

**२.** तसेच, उक्त वसाहतीतील अंतर्गत रस्ते व साफसफाईची कामे यांसाठी शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ पाच/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७, द्वारे **रु.३६,९५,०१८/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

३. त्याशिवाय, शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०२१७/ प्र.क्र.१६१/ पोल-७, दिनांक ०१.०७.२०१७, द्वारे उक्त इमारत क्र. २१, २२, २३, २४, २५, २६, २७, ६७, ६८ व ६९ यांमधील २,४७६ सदनिकांची विद्युतविषयक दुरूस्ती व परिरक्षा यांकरिता रु.१३,२५,७७,८४४/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती (उक्त कामासाठी निधी उपलब्ध करण्यात आला नव्हता).

४. तथापि, उक्त इमारतींमधील सदनिकांमध्ये (सेवा निवासस्थाने) पोलीस कर्मचारी राहण्यास इच्छुक नाहीत. त्यामुळे, शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ एक-ते-पाच/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७, यांच्या द्वारे ज्या कामांसाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्या होत्या ती कामे करण्याचे औचित्य उरले नाही. म्हणून, शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ पोल-७, दिनांक २८.१२.२०१८, द्वारे उक्त पाच शासन ज्ञापने रद्द करण्यात आली आहेत.

५. स्थापत्य दुरूस्तीच्या कामांप्रमाणे विद्युतविषयक कामांचेही औचित्य उरले नसल्याने शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०२१७/ प्र.क्र.१६१/ पोल-७, दिनांक ०१.०७.२०१७, हे सुद्धा रद्द करण्यात यावे असा प्रस्ताव पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी सादर केला आहे. त्या अनुसार शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय.**

शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०२१७/ प्र.क्र.१६१/ पोल-७, दिनांक ०१.०७.२०१७, याद्वारे, ज्या विद्युतविषयक कामांसाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती ती कामे करावयाची नसल्याने उक्त शासन ज्ञापन, याद्वारे, रद्द करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०८१७२८३५८४२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.02.08 17:40:42 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्य मंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (व्यय/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल, पोल-७.